**माहितीचा अधिकार अधिनियम २००५ कलम ५(१) व ५(२) अन्वये जन माहिती अधिकारी, सहायक जन माहिती अधिकारी व कलम १९ (१) अन्वये अपिलीय प्राधिकारी यांची नियुक्ती करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**मराठी भाषा विभाग**
**शासन परिपत्रक क्रमांकः माअनि-२०१५/प्र. क्र.८९/आस्था-१**
**मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.**
**तारीख: १७.६.२०१५.**

**शासन परिपत्रक**

शासन परिपत्रक क्रमांक-माअनि-२०१४/प्र. क्र.७८/आस्था-१, दिनांक २३ जून, २०१४ नुसार मराठी भाषा विभागासाठी (खुद्द) सहायक जन माहिती अधिकारी/ जन माहिती अधिकारी व अपिलिय अधिकारी यांची नियुक्ती करण्यात आलेली आहे. सदर दिनांक २३/६/२०१४ चे परिपत्रक अधिक्रमित करण्यात येत आहेत.

या शासन परिपत्रकान्वये मराठी भाषा विभागासाठी (खुद्द) परिशिष्ट-अ मध्ये नमूद अधिकारी/कर्मचारी यांची माहितीचा अधिकार अधिनियम २००५ कलम ५(१) व ५(२) अन्वये अनुक्रमे राज्य जन माहिती अधिकारी व राज्य सहायक जन माहिती अधिकारी तसेच कलम १९ (१) अन्वये अपिलीय प्राधिकारी म्हणून नियुक्ती करण्यात येत आहे. सदर आदेश तात्काळ अंमलात येतील.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०६१७१२५८४६२८३३ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Aparna Arvind Gawde

Digitally signed by Aparna Arvind Gawde
DN: CN = Aparna Arvind Gawde, C = IN, S = Maharashtra, O = Government Of Maharashtra, OU = Deputy Secretary
Reason: I am the author of this document
Date: 2015.06.17 16:51:06 +05'30'

**(अपर्णा अ. गावडे)**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

प्रत,

१. मा. राज्यपाल यांचे सचिव, राजभवन, मलबारहिल, मुंबई.

२. मा. मुख्यमंत्री यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई.
३. मा. उप मुख्यमंत्री यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई.
४. मा. मुख्य सचिव यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई.
५. मा. राज्य मुख्य माहिती आयुक्त, राज्य माहिती आयोग, नवीन प्रशासन भवन, मुंबई.
६. सर्व राज्य माहिती आयुक्त, राज्य माहिती आयोग, बृहन्मुंबई, कोकणभवन-नवीमुंबई, पुणे विभाग, नाशिक विभाग, औरंगाबाद विभाग, अमरावती विभाग.
७. सचिव, मराठी भाषा विभाग, मंत्रालय, मुंबई.
८. प्रबंधक, मूळ न्याय शाखा, उच्च न्यायालय, मुंबई.
९. प्रबंधक, अपिल शाखा, उच्च न्यायालय, मुंबई.
१०.उप सचिव/सर्व अवर सचिव/सर्व कक्ष अधिकारी, मराठी भाषा विभाग, मंत्रालय, मुंबई.
११.उप सचिव, सामान्य प्रशासन विभाग (कार्या.६), मंत्रालय, मुंबई.
१२.अवर सचिव सामान्य प्रशासन विभाग (कार्या.६), मंत्रालय, मुंबई.
१३.कक्ष अधिकारी (नोंदणी शाखा) यांना विनंती करण्यात येते की, या संबंधीचे बदल दर्शनी फलकामध्ये करण्यात यावेत.
१४. निवड नस्ती.

## परिशिष्ट-अ

माहितीचा अधिकार अधिनियम २००५ कलम ५(१) व ५(२) व कलम १९ (१) अन्वये घोषित करण्यात आलेले **राज्य जन माहिती अधिकारी** व **राज्य सहायक जन माहिती अधिकारी** तसेच **अपिलीय प्राधिकारी** यांची यादी.

| अ. क्र. | विषय | राज्य सहायक जन माहिती अधिकारी | राज्य जन माहिती अधिकारी | अपिलिय अधिकारी |
|---|---|---|---|---|
| १ | आस्थापना-१<br>मराठी भाषा विभाग (खुद्द) आस्थापनाविषयक बाबी. | सहायक, आस्थापना-१ | कक्ष अधिकारी, आस्थापना-१ | अवर सचिव (गृहव्यवस्थापन) |
| २ | रोखशाखा<br>१.मराठी भाषा विभागातील अधिकारी/कर्मचारी यांची देयके आहरण व संवितरण<br>२. मराठी भाषा विभाग (खुद्द) खर्चमेळ्याची कामे<br>३.सेवा पुस्तकाच्या सर्व नोंदी जतन करणे. | सहायक/रोख लेखापाल रोखशाखा | कक्ष अधिकारी, रोखशाखा | अवर सचिव (आस्था) |
| ३ | अर्थसंकल्प शाखा<br>१. विभाग (खुद्द) व क्षेत्रीय कार्यालयांचे अर्थसंकल्पीय अंदाज (सुधारित अर्थसंकल्पासह) व तद्नुषंगिक इतर सर्व बाबी व समन्वय.<br>२. विनियोजन लेखे | सहायक, अर्थसंकल्प | कक्ष अधिकारी, अर्थसंकल्प | अवर सचिव (गृहव्यवस्थापन) |
| ४ | नोंदणी शाखा<br>१. विभागात आलेले टपाल/नस्त्या यांची आवक-जावक (गोपनीय टपालासह) नोंदी ठेवणे व त्यांचे कार्यासन निहाय वाटप करणे<br>२. मराठी भाषा विभागातील अभिलेख्यांची नोंदणी व जतन<br>३. विधानमंडळ कामकाजाशी संबंधित समन्वयाची कामे. | सहायक, नोंदणी शाखा | कक्ष अधिकारी, नोंदणी शाखा | अवर सचिव (गृहव्यवस्थापन) |
| ५ | आस्थापना-२ | सहायक, आस्था-२ | कक्ष अधिकारी, आस्थापना-२ | अवर सचिव (आस्था) |

| | | | | |
|---|---|---|---|---|
| | भाषा संचालनालय, महाराष्ट्र राज्य मराठी विश्वकोश निर्मिती मंडळ, महाराष्ट्र राज्य साहित्य व संस्कृती मंडळ, राज्य मराठी विकास संस्था या क्षेत्रीय कार्यालयांच्या सर्व आस्थापना विषयक बाबी | सहायक, आस्था-२ | | |
| ६ | भाषा-१<br>विभागांतर्गत स्थापन केलेल्या समित्यांचे कामकाज, अभिजात भाषा विषयक कामकाज, मराठी भाषा धोरण विषयक कामकाज | सहायक, भाषा-१ | कक्ष अधिकारी, भाषा-१ | अवर सचिव (आस्था) |
| ७ | भाषा-२<br>भाषा संचालनालय आणि महाराष्ट्र राज्य मराठी विश्वकोश निर्मिती मंडळाचे आस्थापना विषयक कामकाज वगळून इतर सर्व कामकाज | सहायक, भाषा-२<br>सहायक, भाषा-२ | कक्ष अधिकारी, भाषा-२ | अवर सचिव (भाषा) |
| ८ | भाषा-३<br>महाराष्ट्र राज्य साहित्य व संस्कृती मंडळ आणि राज्य मराठी विकास संस्था या कार्यालयांचे आस्थापना विषयक काकमाज वगळून इतर सर्व कामकाज | सहायक, भाषा-३ | कक्ष अधिकारी, भाषा-३ | अवर सचिव (भाषा) |